**महाराष्ट्र शासन**
वित्त विभाग
शासन निर्णय क्रमांक प्रवास-1091/335/सेवा-5,
मंत्रालय, मुंबई-400 032, दिनांक 20 मार्च, 1992.

**पहा:** 1) शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक आरपीएस-1288/568/सेवा-10, दिनांक 3 ऑक्टोबर, 1988.

2) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक प्रवास-1689/48/89/सेवा-5, दिनांक 29 ऑगस्ट, 1989.

**शासन निर्णय:** शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक आरपीएस-1288/568/सेवा-10, दिनांक 3 ऑक्टोबर, 1988 अन्वये प्रवास भत्त्याच्या दरात सुधारणा करण्यात आली. तदनंतर शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक प्रवास-1689/48/89/सेवा-5, दिनांक 29 ऑगस्ट, 1989 अन्वये विमान प्रवासावरील काही निर्बंध काढून टाकण्यात आले. त्यामुळे देशांतर्गत मार्गावरील विमान प्रवासासाठी उपलब्ध असलेल्या एक्झीक्युटीव्ह वर्ग व इकॉनॉमी वर्ग या 2 वर्गापैकी एक्झिक्युटीव्ह हा वर्ग रू.7300-100-7600 या व यापेक्षा अधिक वेतनश्रेणीत वेतन घेणा-या अधिका-यांना अनुज्ञेय झाला. तसेच शासन निर्णय, वित्त विभाग, दिनांक 3 ऑक्टोबर, 1988 च्या परिच्छेद-4(2) अनुसार रू.5,100/- व त्याहून अधिक वेतन घेणा-या अधिका-यांना रेल्वेने वातानुकूलित प्रथम वर्ग अनुज्ञेय आहे. आता काटकसरीच्या उपाययोजना लागू करण्याच्या दृष्टीने विमान प्रवास व रेल्वे प्रवास याबाबत काही निर्बंध लागू करण्याचा शासनाने निर्णय घेतला आहे.

2. शासन आता असा आदेश देत आहे की, राज्य शासनाच्या रू.7300-100-7600 या व यापेक्षा अधिक वेतनश्रेणीत वेतन घेणा-या अधिका-यांना विमान प्रवासासाठी एक्झिक्युटीव्ह हा वर्ग यापुढे अनुज्ञेय असणार नाही. या निर्णयानुसार राज्य शासनातील ज्या अधिका-यांना विमान प्रवास अनुज्ञेय आहे असे सर्व अधिकारी 'इकॉनॉमी' वर्गाने विमान प्रवास करण्यास पात्र असतील. त्याचप्रमाणे जे अधिकारी रेल्वेच्या वातानुकूलित प्रथम वर्गाने प्रवास करण्यास पात्र आहेत, त्यांना यापुढे रेल्वेचा वातानुकूलित प्रथम वर्ग अनुज्ञेय असणार नाही. राजधानी एक्सप्रेसने प्रवास करतानासुध्दा वातानुकूलित प्रथम वर्ग हा या अधिका-यांना अनुज्ञेय असणार नाही.

3. हे आदेश सार्वजनिक क्षेत्रातील उपक्रमे, मंडळे इत्यादी मधील अध्यक्ष, संचालक आणि अन्य अधिकारी यांनासुध्दा लागू आहेत. मंत्रालयातील संबंधित प्रशासकीय विभागांनी हे आदेश त्यांच्या नियंत्रणाखाली असलेल्या सार्वजनिक क्षेत्रातील उपक्रमे, मंडळे इत्यादींच्या नजरेस तात्काळ आणावेत.

4. हे आदेश दिनांक 1 एप्रिल, 1992 पासून लागू असतील.

5. या आदेशाची इंग्रजी प्रत सोबत जोडली आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

मंगला मं. कोरगांवकर,
शासनाच्या उप सचिव,
वित्त विभाग.

प्रति

महालेखापाल-1 (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई.

शामुमु.रोटा/एच-1021(12500+10-492)-1.

महालेखापाल-2 (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, नागपूर,
महालेखापाल-1 (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, मुंबई,
महालेखापाल-2 (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, नागपूर,
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
राज्यपालांचे सचिव,
मुख्य मंत्र्यांचे सचिव,
सर्वमंत्री/राज्यमंत्री/उपमंत्री यांचे स्वीय सहाय्यक,
मंत्रालयीन सर्व विभाग,
सर्व विभागीय आयुक्त,
मंत्रालयाच्या सर्व विभागाखालील विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख,
* प्रबंधक, उच्च न्यायालय (मूळ शाखा), मुंबई,
* प्रबंधक, उच्च न्यायालय (अपील शाखा), मुंबई,
* सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
* सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
* प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई,
सिनियर रिसर्च ऑफिसर, पे रिसर्च युनिट, भारत सरकार, वित्त मंत्रालय, (व्यय विभाग), खोली क्रमांक 261, नॉर्थ ब्लॉक, नवी दिल्ली,
संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई,
मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी हिशेब, मुंबई,
उपमुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी हिशेब, मुंबई/पुणे/नागपूर/औरंगाबाद/नाशिक, अमरावती,
जनसंपर्क अधिकारी, मंत्रालय, मुंबई,
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य लेखा व वित्त अधिकारी,
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
वित्त विभागातील सर्व कार्यासने,
निवड फाईल, वित्त विभाग, सेवा-5.

*पत्राद्वारे.

GOVERNMENT OF MAHARASHTRA,
FINANCE DEPARTMENT,
Government Resolution, No.Pravas-1091/335/SER-5,
Mantralaya, Bombay-400 032.
Dated the 20th March 1992.

READ : (1) Government Resolution, Finance Department, No.RPS-1288/568/SER-10, dated 3.10.1988.

(2) Government Resolution, Finance Department, No.Pravas-1689/48/89/SER-5, dated 29.8.1989.

RESOLUTION : According to the orders contained in Government Resolution, Finance Department, No.RPS-1288/568/SER-10, dated 3rd October 1988 the rates of Travelling Allowance have been revised. Thereafter under the Government Resolution, Finance Department, No.Pravas-1689/48/89/SER-5, dated 29.8.1989, certain restrictions on Air Travel have been removed and under para 5 thereof, the Government Officers drawing pay in the pay scale of Rs.7300-100-7600 and above are held eligible to travel by "Executive Class" while travelling in India by air. Similarly according to para 4(ii) of the Government Resolution, Finance Department dated 3.10.1988 the Government Officers drawing pay in the pay range of Rs.5100 and above are held eligible to travel by A.C. Ist Class. But since economy measures are to be implemented with immediate effect, Government has decided to impose certain restrictions on travelling by air and railway,

2. Government is pleased to direct that the Government Officers, drawing pay in the pay-scale of Rs.7300-100-7600 and above shall not hereafter be eligible for "Executive Class" while travelling by air. All the Government Officers who are eligible to travel by air, will be eligible for "Economy Class" only, while travelling by air. Similarly the Officers who are eligible to travel by railway by A.C. Ist Class shall not, hereafter, be eligible to travel by A.C. Ist Class including the journey by Rajdhani Express.

3. These orders are applicable to the Chairman, Director and other officers in the Public Sector Undertakings and Boards etc. also. The concerned Administrative Departments of the Mantralaya should bring these orders to the Notice of the Public Sector Undertakings and Boards under their administrative control immediately.

4. These orders shall take effect from 1st April 1992.

By order and in the name of the Governor of Maharashtra,

M.M.KORGAONKAR
Deputy Secretary to Government,
Finance Department.

----

H-1021(12,050+10-3-92)